सन २०२१-२२ करिता प्रशासकीय इमारतीचे बांधकाम (४४०६-००२६) या योजनेंतर्गत निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१२४/फ-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
**दिनांक :- ३१ मार्च, २०२२**

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. ०६ एप्रिल, २०२१
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून, २०२१
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १४.१०.२०२१
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २८.०१.२०२२
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १७ मार्च, २०२२
६. महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांकित दिनांक १४.०९.२०२१
७. महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांकित दिनांक १२.०१.२०२२
८. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.२०/२०२१-२२/६४५, दिनांक ०८.०३.२०२२

**प्रस्तावना :-**

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता प्रशासकीय इमारतीचे बांधकाम (४४०६-००२६) या लेखाशिर्षाअंतर्गत ५०-इतर खर्च अंतर्गत रु.३००.०० लक्ष व ५३-मोठी बांधकामे अंतर्गत रुपये २७००.०० लक्ष असे एकूण रु.३०००.०० लक्ष नियतव्यय सुधारीत अंदाजानुसार मंजूर व अर्थसंकल्पित करुन दिलेला आहे. संदर्भ क्र.६ व ७ च्या शासन निर्णयान्वये ५०-इतर खर्च अंतर्गत रु.१००.०० लक्ष व ५३-मोठी बांधकामे अंतर्गत रुपये ९००.०० लक्ष असे एकूण रु.१०००.०० लक्ष इतका निधी वितरित करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.५ चे परिपत्रकान्वये सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या उर्वरित कालावधीसाठी अनिवार्य व कार्यक्रमांर्गत तरतूदींचा उर्वरित संपूर्ण १०० % निधी बिम्स प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आला आहे. तसेच उर्वरित उद्दिष्टांमधील कार्यक्रमांतर्गत खर्चाचे निधी वितरणासाठी नियोजन विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाची आणि अनिवार्य खर्चाच्या निधी वितरणासाठी वित्त विभगाची मान्यता घेण्यात यावी, असे नमूद केले आहे.

सदर योजनेअंतर्गत प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून संदर्भ क्र.८ अन्वये रु.७४५८.१८ लक्ष रकमेचे चालू बाब/नवीन बाब प्रस्ताव प्राप्त झाला असून अनुदान उपलब्ध करुन देण्यास विनंती केली आहे. त्यानुसार या कामासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यानी संदर्भ क्र.८ नुसार सादर केलेला प्रस्ताव व वित्त विभागाचे संदर्भ क्र.१,२,३,४ व ५ येथील परिपत्रक व शासन निर्णय विचारात घेता, प्रस्तावातंर्गत मागणी लक्षात घेऊन, सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता प्रशासकीय इमारतीचे बांधकाम

(४४०६-००२६) या योजनेतून **"५०-इतर खर्च" अंतर्गत रु.११०.०० लक्ष** व **५३-मोठी बांधकामे अंतर्गत रु.९६४.३० लक्ष असे एकूण रु.१०७४.३० लक्ष** इतका निधी वित्त विभागाच्या संदर्भ क्र.४ दिनांक २८.०१.२०२२ च्या शासन परिपत्रकातील तरतूदीच्या अधीन राहून खालील तक्त्यात दर्शविल्यानुसार वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

| वृत्त | वनविभाग | कामाचा तपशिल | (४४०६-००२६) उपशिर्ष | प्रस्तावाची रक्कम (रु.लाखात) |
|---|---|---|---|---|
| नागपूर | नागपूर | संयुक्त प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करणे | ५३-मोठी बांधकामे | २१४.३० |
| धुळे | धुळे | प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करणे | ५३-मोठी बांधकामे | ७५०.०० |
| औरंगाबाद | औरंगाबाद | प्रशासकीय इमारीचे Sump wall Pump House व विद्युतीकरण इत्यादी कामे | ५०-इतर खर्च | ११०.०० |
| | | | **एकूण :-** | **१०७४.३०** |

**<u>अटी व शर्ती खालीलप्रमाणे आहेत :-</u>**

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.

२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३. नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

४. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.

५. संस्थेने आर्थिक वर्ष २०२१-२२ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.

६. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करावे.

७. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

८. संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांना उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

९. उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

१०. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक ०६.०४.२०२१, २४.०६.२०२१, १४.१०.२०२१, २८.०१.२०२२ व १७.०३.२०२२ चे परिपत्रक व शासन निर्णयातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

११. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक सी-१०, प्रधान लेखाशिर्ष ४४०६, वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च, राज्य योजना अंतर्गत योजना, (०१) वनीकरण, ०७० दळणवळण व इमारती, (००) (०२) वनातील इमारती बांधकाम (४४०६ ००२६) या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१४०/१४७४, दिनांक २८.०३.२०२२ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१२७/२०२२/व्यय-१०, दिनांक ३०.०३.२०२२ अन्वये वित्त विभागाचे दिनांक ०६.०४.२०२१, २४.०६.२०२१,१४.१०.२०२१, २८.०१.२०२२ व १७.०३.२०२२ परिपत्रक व शासन निर्णय तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३११८५००४८३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAJENDRA PRAKASH NARWANE

Digitally signed by GAJENDRA PRAKASH NARWANE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=088951d0088e627aa56c9ab088add1677b8ac27d637c5cdf80b730f756dce9e8, cn=GAJENDRA PRAKASH NARWANE
Date: 2022.03.31 18:51:50 +05'30'

**( गजेंद्र नरवणे )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनसंरक्षक (प्रा.) नागपूर
४. वनसंरक्षक (प्रा.) धुळे
५. मुख्य वनसंरक्षक (प्रा.) औरंगाबाद
६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
९. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)